**उपहारगृह सुरु करण्यासाठी आवश्यक परवानग्यांचे सुलभीकरण करण्यासाठी शासनास शिफारशी करण्याकरिता समितीची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/प्र.क्र.२१७/नवि-२०**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक- ०९ सप्टेंबर,२०१४.**

**वाचा §**

१) शासन निर्णय क्र.एमटीसी २००५/२/प्र.क्र.१७२/पर्यटन, दिनांक १६ डिसेंबर,२००६.

२) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.संकीर्ण २००७/ पर्यटन/प्र.क्र.२१७/नवि-२०, दिनांक ६/११/२०१२.

**प्रस्तावना §**

राज्यात पर्यटन विषयक प्रकल्पांना सोयीसुविधा उपलब्ध करुन देणे तसेच पर्यटनास चालना देणे यादृष्टीने राज्याचे पर्यटन धोरण दिनांक १६ डिसेंबर,२००६ रोजी जाहिर करण्यात आले आहे. सदर पर्यटन धोरणातंर्गत पर्यटकांसाठी पर्यटन स्थळी पायाभूत सुविधांचा विकास हे उद्दिष्ट असून उपहारगृहे सुरु करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या विविध परवानग्या प्राप्त करुन घेण्यात मोठया प्रमाणात अडचणी येतात. परवानग्या घेण्याच्या सदर प्रक्रियांचे सुलभीकरण करणे व प्रक्रियेतील विलंबास प्रतिबंध करण्याच्या दृष्टीने काय उपाययोजना करता येतील याकरिता शिफारशी करण्यासाठी शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.संकीर्ण २००७/ पर्यटन/प्र.क्र.२१७/नवि-२०, दिनांक ६/११/२०१२ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या उच्चस्तरीय समितीमध्ये हॉटेल व्यावसायिकांच्या प्रतिनिधींचा समावेश करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय§**

उपहारगृहे सुरु करण्यासाठी आवश्यक परवानग्या कमी करणे व वेळेत मिळण्यासाठी अवलंबिण्याची कार्यपध्दती ठरविण्यासाठी शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. संकीर्ण २००७/ पर्यटन/प्र.क्र.२१७/नवि-२०, दिनांक ६/११/२०१२ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या उच्चस्तरीय समितीत खालील सदस्यांचा समावेश करण्यात येत आहे-:

१) नॅशनल रेस्टॉरंट असोसिएशन ऑफ इंडियाचा एक प्रतिनिधी

२) इंडियन हॉटेल आणि रेस्टॉरंट असोशिएशनचा एक प्रतिनिधी

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१५३९०४३४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Shankar Shete
Date: 2014.09.09 17:18:01 +05'30'

**(प्र.शं. शेटे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२. मा. मंत्री वित्त यांचे खालगी सचिव

३. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खालगी सचिव

४. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव

५. अपर मुख्य सचिव,गृह विभाग

६. अपर मुख्य सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

७. आयुक्त, बृन्हमुंबई महानगरपालिका

८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य

९. प्रधान सचिव (राज्य उत्पादन शुल्क) गृह विभाग

१०. आयुक्त, अन्न व औषध प्रधासन संचालनालय.

११. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय

१२. नॅशनल रेस्टॉरंट असोसिएशन ऑफ इंडिया, ४ था मजला, फेज-२, पीएचडी हाऊस, ४/२ सिरि इन्स्टिट्यूशनल एरिया, ऑगस्ट क्रांती मार्ग, नवी दिल्ली- ११० ०१६

१३. इंडियन हॉटेल आणि रेस्टॉरंट असोशिएशन, बी-२, वडाळा श्रीराम इंडस्ट्रियल इस्टेट, तळमजला, जी.डी. आंबेकर मार्ग, वडाळा, मुंबई- ४०० ०३१

१४. प्रधान सचिव (नवि-०२) यांचे विशेष कार्य अधिकारी

१५. निवडनस्ती नवि-२०